**प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने अनुसुचित जाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेला रुपये रु. १,६४,६६,३८३/- एवढा निधी कृषि आयुक्तालयास वितरित करण्याबाबत.**
**लेखाशिर्ष-(२४०१ B३७५)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२१/प्र.क्र. ११०/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०६ डिसेंबर, २०२१

**वाचा:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३ डिसेंबर, २०२०
२. केंद्र शासनाच्या अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे इंग्रजी No. FM-11/5/2020-DS Part-3, Dated: 04.09.2020 चा ई-मेल व इंग्रजी No. FM-11/5/2020-DS Part-3, Dated:25.02.2021 चे पत्र.
३. केंद्र शासनाच्या अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे इंग्रजी No:FM-11/148/2020-FME, Dated:18.03.2021 चे पत्र.
४. केंद्र शासनाच्या अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे इंग्रजी No. FM-11/5/2020-DS Part-3, Dated: 19.03.2020 व दि. २४.०३.२०२१ राजीचे पत्र.
५. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे,दि. ३० मार्च, २०२१
६. आयुक्त (०कृषी) तथा अध्यक्ष राज्य कार्यकारी समिती (PMFME), कृषी आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र. पीएमएफएमई/प्रमाप्रस्ताव/१३९५७/२०२१, दिनांक १९/०४/२०२१ चे पत्र
७. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रअयो-२०२१/प्र.क्र.७५/९-अे, दि. १५ जून, २०२१
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: बीजीटी-२०२१/प्र.क्र. १६/अर्थसंकल्प (विघयो), दि. २४ नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

"प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना" ही "एक जिल्हा-एक उत्पादन" या धर्तीवरील केंद्र पुरस्कृत योजना **वाचा येथील क्र. १** येथील शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी राज्यामध्ये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेमध्ये केंद्र शासनाचा हिस्सा ६०% तर राज्य शासनाचा हिस्सा ४० % असा असणार आहे.

सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात होणारा सर्व खर्च (१००%) केंद्र शासनाकडून केला जाणार आहे. तद्नंतर केंद्राने सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठीची राज्याच्या हिश्याची रक्कम पुढील चार वर्षात समान हिस्याने राज्याकडून समायोजित (Adjust) करुन घेतली जाणार आहे. सदरहू योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी प्रकल्प व्यवस्थापन कक्षाची स्थापना, वेगवेगळे अभ्यास अहवाल, प्रचार व प्रसिध्दी आणि योजनेच्या मार्गदर्शक सूचनांमधील इतर नियोजित बाबींकरिता केंद्र शासनाने **वाचा येथील क्रमांक २**

येथील दिनांक ०४.०९.२०२० च्या पत्रान्वये पहिला हप्ता म्हणून रुपये ९,८९,७८,०००/- (रुपये नऊ कोटी एकोणनव्वद लाख अठ्याहत्तर हजार केवळ) एवढा निधी थेट आयुक्त (कृषी) यांचे कार्यालयास पीएफएमएस प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिला असून त्यात अनुसचित जाती प्रवर्गाचा रु. ८२,१५,१७४/- लाख एवढा निधी खर्च करण्यास **वाचा येथील क्रमांक ५** येथील दिनांक ३० मार्च, २०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच उक्त योजनेअंतर्गत सन २०२०-२१ मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु. २,४६,८१,५५७/- एवढया निधीचा कार्यक्रम राबविण्यास वाचा येथील क्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये सुधारित मान्यता देण्यात आली आहे.

सदरहू योजनेची सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये अंमलबजावणी करण्यासाठी रुपये ४४७३.०० लाख किंमतीचा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा तयार करुन मा. मुख्य सचिव यांच्या मान्यतेने दिनांक २५.०१.२०२१ च्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने केंद्र शासनाने रुपये ४४३१.५९३ लाख (रुपये चौव्वेचाळीस कोटी एकतीस लाख एकोणसाठ हजार तीनशे केवळ) एवढ्या किंमतीचा प्रकल्प अंमलबजावणीचा आराखडा मंजूर केल्याचे **वाचा येथील क्रमांक ३** येथील दिनांक १८.०३.२०२१ च्या पत्रान्वये कळविले आहे.

प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने अनुसुचित जाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेला रुपये रु. १,६४,६६,३८३/- एवढा निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने **वाचा येथील क्र. ८** येथील दि. २४.११.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

१. प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने अनुसुचित जाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेला रु. १,६४,६६,३८३/- (रुपये एक कोटी चौसष्ट लाख सहासष्ट हजार तीनशे त्र्यांऐशी फक्त) एवढा निधी (सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पिय तरतूदीतून) आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र. एन-०३
२४०१- पीक संवर्धन
७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना
०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना
(०१)(२६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)
३३ अर्थसहाय्य (२४०१ B३७५)

३. सदर रक्कमेचे कोषागारातून आंहरण व संवितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर कोषागारातून आंहरण व संवितरण करण्यासाठी जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. कोवीड-१९ मुळे राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखानिर्षानिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभागा यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

६. नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठी निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर नियंत्रण ठेवता येईल.

७. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्ह्यात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), राज्यस्तरीय तांत्रिक संस्था (SLTI) व इतर यंत्रणांकरिता जिल्हा स्तरावर अवलंबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दतीबाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीजीटी-२०२१ /प्र.क्र.१६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २४ नोव्हेंबर, २०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२०६१२३१३०२७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.12.06 12:32:57 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
५. सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९. सचिव, (कृषी) कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१०.आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११.आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१४.सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५.सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१८. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२०.सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
२१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२२.कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३.निवड नस्ती/९-अे.